नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना " लागू असलेल्या न्यायिक अधिकाऱ्यांना वेतन व भत्त्याची थकबाकी अदा करण्याबाबतची कार्यपद्धती.

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग**
**शासन परिपत्रक क्र.एचसीटी २०११/प्र.क्र.१२/का.३,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दि. ११ मार्च, २०११**

वाचा- विधी व न्याय विभाग शासन निर्णय क्रमांक एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन, दि.२२.१०.२०१०

**शासन परीपत्रक**

शासन वित्त विभागाच्या क्र.अंनियो १००५/१२६/सेवा ४, दि.३१ ऑक्टोंबर, २००५ अन्वये राज्य शासनाच्या सेवेत १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी लागू करण्यात आलेली नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना दुय्यम न्यायालयातील नव्याने नियुक्त झालेल्या न्यायिक अधिकाऱ्यांना सुद्धा लागू करण्यात आली आहे.

२. न्यायिक अधिकाऱ्यांना विधी व न्याय विभागाच्या शासन निर्णय क्रमांक एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन, दि.२२.१०.२०१० च्या शासन निर्णयानुसार मा.न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारित वेतन व भत्ते अदा करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या न्याय निर्णयानुसार न्यायिक अधिकाऱ्यांना देय होणारी थकबाकीची ६० टक्के रक्कम रोखीने व उर्वरित ४० टक्के रक्कम भविष्य निर्वाह निधी मध्ये जमा करावयाची आहे.

३. नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांच्या थकबाकीची रक्कम जमर करण्यासंदर्भात वित्त विभाग शासन निर्णय क्र.अंनियो १०१०/प्र.क्र.६७/सेवा-४, दि.१४ डिसेंबर, २०१० मध्ये नमूद करण्यात आलेल्या कार्यपद्धती प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. वित्त विभागाचा दि.१४ डिसेंबर, २०१० चा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.msharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र.२०१०१२१५१९००४६००१ असा आहे.

४. सदर परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४९/२०११/सेवा-७, दि.७.२.२०११ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( द.फु.गायकवाड )
अवर सचिव

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

H:Padmanabhan

मा. मंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
मा. राज्यमंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
महालेखापाल-एक /दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
महालेखापाल-एक /दोन (लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, मुंबई / पुणे /नागपूर /औरंगाबाद/अमरावती /अकोला/ठाणे.
मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधीश
संचालक, न्यायीक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
धर्मादाय आयुक्त, मुंबई
विधी व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने
विधी व न्याय विभाग / का.७ (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
वित्त विभाग ( व्यय-६, सेवा - ४)
सर्व मंत्रालयीन विभाग
निवडनस्ती.